धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या सन २०१६-२०१७ च्या अर्थसंकल्पातील तरतूद भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई मधील स्वीय प्रपंजी लेखा (P.L.A.) खात्यात जमा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- सीसीएफ २०१६/प्र.क्र. १०५/२०१६/२५**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक- २५ जानेवारी, २०१७.

संदर्भ : शासन निर्णय क्रमांक सीसीएफ-२०१६/प्र.क्र.१०५/२०१६/२५, दि.१७ मे, २०१६

**शासन निर्णय-**

सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीकरिता मागणी क्रमांक ए-५, प्रधानशीर्ष-२२५०-इतर सामाजिक सेवा-१०१ - धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या- (००) (०१) - धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या (संकेतांक क्रमांक २२५० ००१२ ) योजनेतर- (दत्तमत) उद्दिष्ट - ५० - इतर खर्च - या लेखाशीर्षाखाली रु.५,००,००,०००/- (रुपये पाच कोटी फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीपैकी वित्त विभागाने अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकान्वये उपरोक्त लेखाशीर्षाखाली ८० टक्केच्या मर्यादेत रु.४,००,००,०००/- (रुपये चार कोटी) अर्थसंकल्पीय वितरणप्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आली आहे. उर्वरित २० टक्केच्या मर्यादेतील रु.१ कोटी रक्कम वितरित करण्यास वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७९३/१६/व्यय-४ दि.२५/११/२०१६ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६१/अर्थ-१४/१६ दि.३०/११/२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सामान्य प्रशासन विभागास उपलब्ध करून दिली आहे. सदर रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतकी रक्कम रिझर्व्ह बँक, मुंबई येथील मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या मुख्य सचिव यांच्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) क्रमांक ०१५१४५०१०८९(६१८४०३६००६) मध्ये जमा करण्यासाठी या शासन आदेशाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाकडून आहरीत करुन स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) क्रमांक ०१५१४५०१०८९ (६१८४०३६००६) मध्ये जमा करण्यास श्री.शिवाजी तु. धामणकर, अवर सचिव यांना “**आहरण व संवितरण अधिकारी**” तसेच श्रीमती शुभांगी सु.आगाशे, उप सचिव यांना “**नियंत्रक अधिकारी**”, घोषित करण्यात येत आहे.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी उपरोक्त दर्शविलेली रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतकी रक्कम मागणी क्रमांक ए-५, प्रधानशीर्ष - २२५० - इतर सामाजिक सेवा -१०१- धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या- (००) (०१) - धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या (संकेतांक क्रमांक २२५०००१२ ), योजनेतर- (दत्तमत) उद्दिष्ट -५०-इतर खर्च- या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षामध्ये खर्ची दाखवून (के) ठेवी व आगाऊ रकमा (बी) बिनव्याजी ठेवी (८४४३), नागरी ठेवी (१०६), वैयक्तिक ठेवी (८४४३५०८४) या लेखाशीर्षाखाली जमा दाखवावी व सदर रकमेचा धनादेश "Chief Minister's Donations for Charitable Purposes Fund" या नावाने काढण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०१२५१५२०२२०५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वीक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Shivaji Tukaram Dhamankar

Digitally signed by Shivaji Tukaram Dhamankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4272a9eacd83519296781a1ecad5c4f1a6fc8983669dcd236ae7ed270c73b725, cn=Shivaji Tukaram Dhamankar
Date: 2017.01.25 15:18:44 +05'30'

**( शिवाजी तु.धामणकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (डीसी-४)
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (एसी-४)
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (दोन प्रती)
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग/अर्थसंकल्प १४/अर्थोपाय कक्ष/व्यय-४, मुंबई
८) निवड नस्ती.